# बिन नावाचा मुलगा

लेखक : इद्रीस शाह



रेखाटने: मोना कॅरोन

# ‘बिन नावाचा मुलगा’

– लेखक : इदरीस  शाह.

*आपल्या नावाच्या शोधात असलेल्या एका छोट्या मुलाची ही गोष्ट आहे. तो शोध घेतो तेव्हा  त्याला आपले नाव तर मिळतेच, पण आपले जुने स्वप्न टाकून नवे अद्भुत स्वप्नही त्याला मिळते.*

*लेखक इद्रीस शाह यांनी लहान मुलांसाठी लिहिलेल्या सचित्र कथा मालिकांपैकी ही एक कथा आहे.मध्यपूर्व आणि मध्य आशियातील आख्यान परंपरेतील हजारो वर्षांपूर्वीच्या या गोष्टी आहेत.लेखकाने ३० वर्षांहूनही अधिक काळ मौखिक आणि लिखित स्रोतांमार्फत या गोष्टी गोळा केल्या आणि आजच्या बाल वाचकांसाठी त्या लिहिल्या. जीवनाच्या / स्वप्नपूर्तीच्या वाटेवरून चालताना नेहमीच या कथा वाचकाला मोहित करतात. या बोध-कथांचा मनावर प्रभाव राहतो.*

*ही गोष्ट सुद्धा – ‘धैर्य आणि निश्चयाने वाटचाल केली तर आपली स्वप्ने सत्यात उतरतात.’- असा  संदेश देते.*

*मोना कॅरोन ही एक पुरस्कार विजेती चित्रकार आहे आणि त्यांची कथेला अनुरूप सुंदर अशी चित्रे हे या कथा-पुस्तकाचे प्रमुख बलस्थान आहे.*



कोणे एके काळी, म्हणजे खूप खूप वर्षापूर्वी इथून दूर  अशा एका देशात एक मुलगा रहात होता. त्याचं नाव ... त्याला नावच नव्हतं. एखाद्याला नावच नाही म्हणजे खूपच विचित्र ! नाही का ? मग तुम्ही नक्कीच   विचाराल   – “ असं कसं? त्याला नाव का नव्हतं ?

तर .. त्याचं काय झालं  ...

त्याचा जन्म झाला. त्याचे आई-वडील त्याच्यासाठी छानसं नाव शोधतच होते .. आणि त्याच दरम्यान एक ज्ञानी बाबा त्यांच्या घरी आले. ते म्हणाले, “हा मुलगा खूप भाग्यवान आहे. एके दिवशी मी त्याला एक अद्भुत / अलौकिक अशी भेट देणार आहे, पण तोपर्यंत कृपा करून याचं काही नाव ठेऊ नका.”

त्याचे आई-वडील म्हणाले, “ ठीक आहे. पण याला याचं नाव कधी मिळेल ?”

“ ते आताच नाही सांगू शकत, पण ...” ते ज्ञानी बाबा म्हणाले, “..लक्षात ठेवा,हा खूप भाग्यवान मुलगा आहे. आणि याचं नाव ठेऊ नका हं !”



... आणि म्हणून त्याचे आई-वडील त्याला म्हणायचे ‘ बेनाम’! त्या देशाच्या भाषेत बेनाम म्हणजे बिन नावाचा ! कारण त्याला काही नावच नव्हते ना !

एक दिवस बेनाम शेजारीच राहणाऱ्या मित्राकडं गेला. तो म्हणाला, “बघ ना, प्रत्येकाला नाव आहे. मलाच काही नाव नाही. मला पण एक नाव असावं असं वाटतं. तुझ्याकडं आहे का एखादं नाव? मला देशील का ?” तो मित्र म्हणाला, “ माझ्याकडं एकच नाव आहे – अन्वर – आणि ते माझं नाव आहे. मला माझं नाव पाहिजे की! ते नाव जर तुला दिलं तर मग मला कोणतं नाव ? शिवाय मी तुला नाव दिलंच तर त्या बदल्यात तू मला काय देणार ? तुझ्याकडं तर काहीच नाही.”



“ माझ्याजवळ एक स्वप्न आहे. ते मला नकोय. ते मी तुला देईन.” – बेनाम म्हणाला.

“ अरे पण आपल्याला कुठं ठाऊक आहे नाव कसं देतात, आणि एकाचं स्वप्न असं दुसऱ्याकडे  कसं पाठवायचं ते.” अन्वर म्हणाला.

“मला आहे ठाऊक.” बेनाम म्हणाला,“ चल, आपण त्या ज्ञानी बाबांकडे जाऊ आणि त्यांनाच विचारू.”

ते ज्ञानी बाबा सारं काही जाणत होतेच, शिवाय सुदैवाने ते काही फार दूर रहात नव्हते.

“ बसा इथं. मी पाहतो माझ्या जादूच्या पेटाऱ्यात काय आहे ते.” ज्ञानी बाबा म्हणाले.

मुलं तिथंच असलेल्या बैठकीवर बसली.

बाबांनी एक छोटासा पेटारा उघडला आणि म्हणाले, “हा आहे जादूचा पेटारा आणि तो ना, वेगवेगळ्या प्रकारच्या नावांनी भरलेला आहे. बघा तर खरं.”

बाबांनी त्या पेटाऱ्याचं झाकण थोडंसं उघडताच मुलांना ती सगळी नावं ऐकू येऊ लागली. नावं, नावं, आणि नावंच. कितीतरी प्रकारची नावं होती. नावं आपलं नाव घेत होती, दुसऱ्याचं नाव घेऊन साद घालत होती. तिथं तर जगातील सर्व देशातील नावं होती.

ज्ञानी बाबांनी त्या पेटाऱ्यातील एक नाव उचललं आणि ते बेनामच्या हाती दिलं. आणि ....

आणि ते नाव पट्कन त्याच्या हातावरून, दंडावरून उड्या मारत निघालं ... खांद्यावर झोका घेतला. तेथून ते कानात शिरलं आणि थेट डोक्यात जाऊन बसलं.

आणि अचानक, त्या बेनामच्या लक्षात आलं की त्यालाही एक नाव आहे ! तो ओरडला, " ए.. हुर्यो .. हुर्यो ... मला पण एक नाव आहे. मी आहे – 'हुसैनी'!

हुसैनी हे त्याचं नाव होतं.



अन्वर ओरडला, " पण मला एक स्वप्न हवयं. हुसैनीनं मला तसं वचन दिलंय."

"बेटा, जरा धीर धर." ज्ञानी बाबा म्हणाले.

त्यांनी दुसरा एक पेटारा घेऊन त्याचं झाकण उघडलं आणि म्हटलं, “लोकांना नको असलेल्या स्वप्नांचा हा पेटारा आहे. हुसैनी, तुझं नको असलेले स्वप्न बाहेर काढण्यासाठी तू तुझ्या डोक्याला हळूच एक फटका दे अन् ते स्वप्न या पेटाऱ्यात ठेऊन दे.”

हुसैनीने तसंच केलं! आणि खरंच, डोक्याला एक फटका दिल्यावर स्वप्न त्याच्या हाती आलं. त्यानं आपला हात पेटाऱ्याच्या बाजूला ठेवताच ते स्वप्न उडी मारून पेटाऱ्यात जाऊन बसलं !



त्यानंतर ज्ञानी बाबांनी आणखी एक पेटारा हातात घेतला, त्याचं झाकण उघडलं आणि म्हटलं, “हा पेटारा सुंदर, चमत्कारिक स्वप्नांनी भरलेला आहे.”

ती दोन्ही मुलं पेटाऱ्यातील अद्भुत, आणि रम्य स्वप्नं पाहण्यात हरखून गेली.



अद्भुत, आणि रम्य स्वप्नं

बाबा म्हणाले, “मी तुम्हा दोघांनाही एकेक स्वप्न देणार आहे. उचला तुम्हाला पाहिजे ते स्वप्न.”

दोघा मुलांनी आपापलं  स्वप्न हाती घेतलं आणि लगेच .. हुसैनीच्या नावानं केलं अगदी तसंच ..  स्वप्नं उड्या मारत त्यांच्या हातावरून खांद्यावर, तेथून कानात आणि मग डोक्यात जाऊन बसली.

त्या  दिवसानंतर बिन नावाच्या त्या मुलाला कायमचं नाव मिळालं   –
‘हुसैनी’




समाप्त